"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव"
अंतर्गत सार्वजनिक आरोग्य
विभागामार्फत राज्यात
आरोग्य विषयक विविध
योजना राबविणेबाबत

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०२१/प्र.क्र. १३२ /समन्वय २
गोकुळदास तेजपाल रुग्णालय कॉम्प्लेक्स,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक: ९ डिसेंबर, २०२१

वाचा:- १) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. संकिर्ण ८२२१/प्र.क्र.१७२(भाग-३)/सां.का.४ दि. १७/०८/२०२१ चे पत्र

२) संचालक आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक आआसे/आ. व्य. मा/ आदर्श गाव प्रस्ताव/२०२१/१९८९ दि. ३०/११/२०२१ चे पत्र

प्रस्तावना:-

यावर्षी आपण भारतीय स्वातंत्र्याच्या ७५ व्या वर्षात पदार्पण करत आहोत. या निमित्ताने केंद्र सरकार व राज्य सरकारच्या माध्यमातून " स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव "विविध पातळीवर साजरा करण्यात येत आहे. स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव हा देशातील प्रत्येक व्यक्तीचा, प्रत्येकाच्या मनाचा उत्सव आहे. स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवाचे आयोजन करत असताना स्वातंत्र्यलढयाची भावना, त्यामागील त्याग, देशाच्या उभारणीतील अनेकांचे योगदान हे नागरिकासह, शालेय विद्यार्थी व तरुणांना अनुभवता आले पाहिजे असा विचार करुन विविध कार्यक्रम देशात राबविण्यात येत आहेत. राज्यातील नागरीकांचे आरोग्यपूर्ण जीवन राखण्यास सार्वजनिक आरोग्य विभाग बांधील असून आरोग्य सेवा पुरविण्यासाठी कटिबद्ध आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाने आता पर्यन्त अर्भक मृत्यू दर, माता मृत्यू दर कमी करण्याचे शाश्वत विकास ध्येयामधील उद्दीष्ट साध्य केले आहेच व आता असांसर्गिक आजारांचे रोंगनियंत्रण, मानसिक स्वास्थ्य, COVID१९ नियंत्रण या आव्हानांचा सामना आरोग्य विभाग सर्वतोपरी करीत आहे.

सार्वजनिक विभागामार्फत " स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव " कालावधीमध्ये राज्यातील पाच हजार गावे मॉडेल हेल्थ विलेज साठी साधारणत: २०० प्राथमिक आरोग्य केंद्रे निवडून त्या अंतर्गत १०००

उपकेंद्रांच्या कार्यक्षेत्रातील पाच हजार गावांची निवड करण्याचे प्रस्तावित असून, राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य केंद्र व शहरी प्राथमिक आरोग्य केंद्र यांचे रूपांतरण आरोग्यवर्धिनीकेंद्रात करून यामध्ये प्रतिबंधात्मक,उपचारात्मक, उपशामक व पुनर्वसनात्मक सेवा अंतर्भूत असतील. सदर ५ हजार गावामध्ये योगासनांचे सत्र आरोग्यवर्धिनी केंद्रात व गावातील सार्वजनिक ठिकाणी नियमितपणे घेण्यात येईल. त्यासाठी शाळा, बचतगट, ग्रामसभा यांचे माध्यमातून योगा, मॅरेथॉन, वाकेथॉन इत्यादी विविध खेळांचे आयोजन करण्यात येईल. आरोग्यवर्धिनी उपकेंद्रामध्ये मनशक्ती क्लिनिकद्वारे मानसिक आजाराबाबत सेवा देण्यात येतील. त्यानुसार " स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव " कालावधी मध्ये १५ ऑगस्ट २०२२ पर्यंत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत ५००० गावांमध्ये आरोग्य विषयक विविध कार्यक्रम राबविण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भारताच्या स्वातंत्र्य प्राप्तीस ७५ वर्ष पूर्ण होत असल्याचे औचित्य साधून केंद्र शासनाच्या वतीने देशभरता "आझादी का अमृत महोत्सव" अंतर्गत विविध कार्यक्रम राबविण्यात येत आहेत. या धर्तीवर राज्यात दि. १५ ऑगस्ट, २०२२ कालावधी दरम्यान सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत सोबत जोडलेल्या प्रपत्र “अ” मधील ५००० गावांमध्ये खालील कार्यक्रम राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) **प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम:-**

**अ) प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम**

या कार्यक्रमाखाली निवडलेल्या पाच हजार गावातील सर्व गर्भवती मातांची आरोग्य तपासणी पूर्ण करण्यात येईल. निवडलेल्या ५००० गावांमधील गर्भवतींची PMSMA (प्रधान मंत्री सुरक्षित मातृत्व अभियान) अंतर्गत विशेषज्ञा मार्फत आरोग्य तपासणी करण्यात येईल. त्यांना आवश्यक प्रयोगशाळा चाचण्या व सोनोग्राफी मोफत केली जाईल. गर्भधारणा कालावधीत मातांना मोफत औषधोपचार देण्यात येईल. आवश्यकतेनुसार त्यांना मोफत संदर्भ सेवा दिली जाईल.

**ब) जननी सुरक्षा योजना -**

जननी सुरक्षा योजने अतर्गत SC/ST/BPL गर्भवती मातांना शासकीय व शासनमान्य खाजगी आरोग्य संस्थेत प्रसुतीसाठी दिल्या जाणा-या लाभाबाबत जनजागृती करण्यात येईल. सदर योजनेमध्ये ग्रामीण भागातील मातांसाठी ७००/-, शहरी भागातील मातांसाठी ६००/- रु व सिजेरीयन शस्त्रक्रीया झाल्यास १५००/- रु एवढा लाभ DBT ( Direct Beneficiary Transfer) व्दारे त्यांच्या बॅकखात्यात जमा केला जाईल.

### क ) JSSK (जननी शिशु सुरक्षा कार्यक्रम)

या योजने अंतर्गत गर्भवती महिलांना प्रसुतीपुर्व व प्रसुती पश्चात ४२ दिवसांपर्यंत व बालकांना एक वर्षापर्यंत मोफत औषधोपचार व संदर्भसेवा दिली जाईल. संस्थात्मक प्रसूती वाढविण्यासाठी सदर गावांमध्ये जनजागृती केली जाईल. सर्व प्रसूती हया शासकीय अथवा शासनमान्य खाजगी रुग्णालयात होतील यासाठी प्रयत्न करण्यात येईल. स्तनपानाचे महत्व जनतेला कळावे यासाठी जनजागृती केली जाईल. VHND च्या माध्यमातून गर्भवती मातांना स्तनपानाचे महत्व विषद केले जाईल. स्तनपान करण्याची पद्धत त्यांना आरोग्य संस्था मध्ये प्रशिक्षित परिचारिका व परिसेविका यांचे माध्यमातून शिकविली जाईल.

### ड) रेफरल ट्रान्सपोर्ट

राष्ट्रीय आरोग्य अभियानातर्फे जननी शिशु सुरक्षा कार्यक्रमांतर्गत रेफरल ट्रान्सपोर्ट हा कार्यक्रम जिल्हास्तरावर जिल्हा शल्य चिकित्सक त्याचप्रमाणे जिल्हा परिषदेचा आरोग्य विभाग यांच्या तर्फे राबविण्यात येतो. या कार्यक्रमांतर्गत प्रसुतीपुर्व वेदनेच्या काळात व प्रसुतीसाठी वेदनेच्या काळात व प्रसुतीसाठी निवासस्थान पोहचविण्यासाठी, तसेच गंभीर आजारी बालके (० ते १ वर्ष) यांना निवासस्थानापासून रुग्णालयात घेऊन जाण्याची मोफत वाहन सेवेची सोय करण्यात आलेली आहे. सदर रुग्णवाहिका/परतीच्या प्रवासासाठी वाहन सेवा १०२ क्रमाकांच्या टोल फ्री क्रमांकावर नागरिकांना पूर्णपणे मोफत उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

### इ) नियमित लसीकरण कार्यक्रम :-

बालकांमधील पोलिओ, क्षयरोग, कावीळ, गोवर, रुबेला, पेंटाव्हॅलंट, घटसर्प, धनुर्वात, डांग्या खोकला, या आजारांमुळे होणारे आजारपण व मृत्यू कमी करणे हे नियमित लसीकरण कार्यक्रमाचे महत्वाचे उद्दिष्ट आहे. या कार्यक्रमात बालकांना वरील आजाराच्या लसी राष्ट्रीय लसीकरण वेळापत्रकाप्रमाणे दिल्या जातात. तसेच गरोदर स्त्रियांना धनुर्वाताची लस दिली जाते. लसीकरणामुळे बालक व गरोदर मातांमध्ये रोगप्रतिकारक शक्ती तयार होते. निवडलेल्या पाच हजार गावातील मातांचे व बालकांचे लसीकरण १०० टक्के पूर्ण केले जाईल. यासाठी नियमित लसीकरण सत्रांचे आयोजन करण्यात येईल. ज्या लाभार्थ्यांचे पूर्ण लसीकरण झालेले नाही अशा लाभार्थ्यांचा शोध घेऊन त्यांचे लसीकरण पूर्ण करण्यात येईल. अशा प्रकारे १०० टक्के लाभार्थ्यांचे लसीकरण पूर्ण केले जाईल.

### फ) राष्ट्रीय किशोरवयीन स्वास्थ्य कार्यक्रम-

किशोरवयीन मुला मुलींची संख्या (वय १०-१९) एकुण लोकसंख्येपैकी २३ टक्के आहे. किशोरवयात झपाटयाने शारीरीक वाढ, भावनिक, मानसिक, लैंगिक बदल होत असतात. याबाबत समाजामध्ये,

कुटुंबामध्ये, शाळा कॉलेजमधून योग्य माहिती मिळणे दुरापास्त असते. चुकीच्या माहितीमुळे किशोरवयीन मुलामुलींमध्ये गैरसमज निर्माण होतात. या गोष्टी टाळण्यासाठी किशोरवयीन मुला मुलींसाठी हा कार्यक्रम राबविण्यात येतो. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार या सर्व ५००० गावांना सेवा देणाऱ्या उपकेंद्र , प्राथमिक आरोग्य केंद्र येथे औषधोपचार व प्रयोगशाळा चाचण्या मोफत देण्यात येतील. त्यासाठी आरोग्यवर्धिनी केंद्रात औषधे व प्रयोगशाळा चाचण्यांसाठी लागणारी साहित्य सामुग्री उपलब्ध करून दिली जातील. राष्ट्रीय किशोर स्वास्थ्य कार्यक्रम अंतर्गत पाच हजार गावातील किशोर वयीन मुलांच्या आरोग्याची चाचणी मैत्री क्लिनिक (Adolescent Friendly Health Clinic) च्या माध्यमातून घेण्यात येईल. यासाठी ग्रामीण रुग्णालय, उप जिल्हा रुग्णालय व जिल्हा रुग्णालय येथे असलेल्या मैत्री क्लिनिक च्या माध्यमातून कार्यवाही केली जाईल.

### ग) राष्ट्रीय बाल सुरक्षा कार्यक्रम-

राष्ट्रीय बाल सुरक्षा कार्यक्रमाअंतर्गत १८ वर्षापर्यंतच्या सर्व मुलांची आरोग्य तपासणी पुर्ण करण्यात येईल. अंगणवाडी मधील ६ वर्षापर्यंतच्या वयोगटातील मुलांची आरोग्य तपासणी पूर्ण करण्यात येईल. पाच हजार गावांमध्ये आरोग्य संस्थांच्या माध्यमातून रक्तक्षय कमी करण्याच्या उद्देशाने माता, बालके, किशोर वयीन मुले यांची आरोग्य तपासणी करण्यात येईल. रक्तक्षय आढळून आल्यास त्यांना मोफत उपचार दिला जाईल. पाच हजार गावांना Anemia मुक्त करण्यासाठी मोठ्या प्रमाणात जन जागृती करण्यात येईल.De-Worming Drive चे आयोजन नियमितपणे केले जाईल.

### ह) कुटुंब कल्याण कार्यक्रम-

राज्यामध्ये अजूनही लोक संख्या नियंत्रणाची आवश्यकता असून त्याबाबत गावातील योग्य त्या जोडप्यांना समुपदेशन करण्यात येईल व तांबी, गर्भ निरोधक गोळया, अंतरा यांचा वापर करण्याबाबत माहिती देण्यात येवून कुटुंब नियोजन पद्धती अवलंबण्यास जनजागृती केली जाईल. सदर ५००० गावांमध्ये कुंटूब कल्याण कार्यक्रमाअतर्गत १०० टक्के उदिदष्ट साध्य करण्यासाठी प्रयत्न केला जाईल.

### २) आयुष सेवा-

आयुष सेवा अंतर्गत आयुर्वेद, योग व निसर्गपचार, युनानी, सिध्द व होमिओपॅथी चिकित्सा पध्दतीचा समावेश करण्यात आला आहे. निवडलेल्या पाच हजार गावातील जनतेला आरोग्यवर्धिनी केंद्राच्या माध्यमातून आयुष सेवा उपलब्ध करून दिल्या जातील. ग्रामीण रुग्णालय, उप जिल्हा रुग्णालय स्तरावरील आयुष तज्ज्ञांच्या माध्यमातून आयुर्वेदा अंतर्गत पेन मॅनेजमेंट (संधी आजार), मधुमेह, अम्लपित्त या आजारांवर होमीओपॅथी अंतर्गत त्वचा व एलर्जीक आजार, श्वसनक्रिया, मुतखडा या आजारांवर युनानी पद्धती अंतर्गत

स्त्रीरोग,पचन विकार व पाईल्स तर योग व निसर्गोपचार या अंतर्गत मधुमेह व पचन विकार या आजारांवर आयुष सेवांचा लाभ ग्रामीण जनतेला मिळवून देण्यात येईल.

### ३) Tele consultation सेवा-

राज्यातील ग्रामीण व आदिवासी जनतेसाठी विशेषमार्फत वैदयकीय सेवा देण्यासाठी टेलिमेडिसीन ही वैद्यकीय क्षेत्रात झपाटयाने विकसीत होत असलेली यंत्रणा आहे. विशेषत यामध्ये टेलिफोन, इंटरनेट किंवा इतर संपर्काव्दारा वैद्यकीय माहितीची आदान प्रदान करणे शक्य होते. वैद्यकीय सल्ल्यासाठी आणि कधीकधी दुर्गम भागातील आजारी रुग्णांचे निदान करण्यासाठी या सुविधेचा उत्तम उपयोग होतो. निवडलेल्या पाच हजार गावातील जनतेला उपकेंद्र व प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावर Tele consultation सेवा उपलब्ध करून देण्यात येईल. या माध्यमातून उपकेंद्र स्तरावर समुदाय आरोग्य अधिकारी यांचे माध्यमातून विशेषज्ञ सेवा मिळवून दिली जाईल. तसेच प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी देखील यामध्ये गरजेनुसार तज्ञांच्या सेवा रुग्णांना Tele consultation च्या माध्यमातून मिळवून देतील. यासाठी आवश्यक साहित्य सामुग्री , उपकरणे व इंटरनेट सुविधा या केंद्रात उपलब्ध करून दिली जाईल. ई संजीवनी Tele Consultation या सॉफ्टवेअर च्या माध्यमातून रुग्णांना E Prescription देण्यात येईल.

### ४) राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रम-

राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत समावेश असलेल्या पैकी राज्यात डासांमार्फत प्रसारित होणाऱ्या हिवताप, हत्तीरोग, डेंगीताप, जॅपनिज एन्सेफेलायटिस, चिकनगुनीया व सॅन्डफलाय मार्फत प्रसारित होणारा चंडीपूरा तसेच पिसवांमार्फत प्रसारित होणाऱ्या प्लेग या रोगांच्या नियंत्रणासाठी शासन स्तरावरुन उपाययोजना राबविण्यात येतात. आरोग्य कर्मचारी (MPW) यांचे गृह भेटीमध्ये निवडलेल्या ५००० गावातील Hydrocele रुग्णांचा शोध घेऊन त्यांच्या शस्त्रक्रियांचे नियोजन केले जाईल. विशेष शिबिरांचे आयोजन करण्यात येईल. उप जिल्हा रुग्णालय स्तर व जिल्हा रुग्णालय स्तरावर Hydrocele साठी शस्त्रक्रिया शिबिरांचे आयोजन केले जाईल.

### ५) गुणवत्ता आश्वासन -

निवडलेल्या पाच हजार गावातील सर्व आरोग्य संस्था kayakalp, NQAS अंतर्गत नोदविण्यात येतील व रुग्णालय स्तरावर LaQshya कार्यक्रम राबविण्यात येईल. निवडलेल्या गावातील संस्थांची NQAS अंतर्गत प्रमाणपत्रासाठी नोंदणी करण्यात येईल. या प्रक्रियेमध्ये निवड केलेल्या संस्थांची प्रथम अंतर्गत मूल्यांकन होऊन त्यानुसार आढळून आलेली कमतरता भरुन काढण्यासाठी कार्यप्रणाली बनविली जाते. या संस्थांची राज्य व राष्ट्रीय पातळीवर पुर्नमूल्यांकन होवून सर्टिफिकेशन केले जाते.

**६) राष्ट्रीय अंधत्व नियंत्रण कार्यक्रम-**

या कार्यक्रमांतर्गत ४०+ वर्षे वयावरील व्यक्तींची डोळयांची तपासणी करुन गरजु व गरीब व्यक्तींना मोफत चष्मे पुरविणे, शासकिय संस्था व स्वयंसेवी संस्थांमार्फत मोतिबिंदू शस्त्रक्रिया, काचबिंदु व इतर नेत्र आजारांबाबत मोफत सेवा पुरविणे, तज्ञ व्यक्तींना प्रशिक्षण देऊन व साहित्य सामुग्री पुरवठा करुन कार्यक्रमात सुधारणा करणे,शालेय विदयार्थ्यांचे नेत्रतपासणी करुन दृष्टीदोष आढळुन आलेल्या विदयार्थ्यांना चष्मे पुरवठा करणे या सेवा देण्यात येतात. निवडलेल्या पाच हजार गावांना मोतीबिंदू मुक्त केले जाईल यासाठी आरोग्य कर्मचाऱ्यां मार्फत गृहभेटी दरम्यान मोतीबिंदू रुग्णाचा शोध घेऊन त्यांची नेत्र तपासणी Ophthalmic Officer यांचे मार्फत केली जाईल. संदर्भ सेवा शिबिरांचे आयोजन प्राथमिक आरोग्य केंद्रे, ग्रामीण रुग्णालये, उप जिल्हा रुग्णालये येथे केले जाईल. जिल्हा रुग्णालय/उप जिल्हा रुग्णालय व वैद्यकीय महा विद्यालय येथे सदर रूग्णांच्या शस्त्रक्रिया केल्या जातील. नेत्र चिकित्सा अधिकारी यांचे माध्यमातून सर्व रुग्णांना Follow up सुविधा दिल्या जातील. संदर्भ सेवा देण्यासाठी विभागातील १०२ रुग्ण वाहिकांचा वापर करण्यात येईल.

**७) राष्ट्रीय असंसर्गजन्य रोगाचे व्यवस्थापन-**

**अ)** असंसर्गजन्य आजाराचे वाढते प्रमाण ही आरोग्यासाठी मोठी समस्या असून या कार्यक्रमांतर्गत नागरिकांच्या वर्तन बदलासाठी आणि समुपदेशनासाठी आरोग्य प्रचार,ग्लुकोमिटर कीट्स व रक्तदाब मापन यंत्र वापरुन मधूमेह व रक्तदाबाचे तपासणी करणे,सामान्य कर्करोग तसेच सर्वसामान्य आढळणारे कर्करोग उदा. गर्भाशयाचा कर्करोग, मुख कर्करोग, स्तन कर्करोग या प्रथमावस्थेत इशारा देणाऱ्या लक्षणांबाबत जागरुकता निर्माण करणे, संशयित रुग्णांना प्राथमिक आरोग्य केंद्र येथे संदर्भित करुन त्यांचे निश्चीत निदान करणे. या सेवा देण्यात येतात. निवडलेल्या गावातील ३० वर्षे वयापेक्षा जास्त वयाच्या सर्व नागरिकांची उच्चरक्तदाब,मधूमह व तीन प्रकारचे कर्करोग (मुख कर्करोग, स्तनांचा कर्करोग व गर्भाशयमुख कर्करोग) तपासणी करण्यात येईल. तपासणी मध्ये आजार आढळल्यास त्वरीत उपचार सुरू करण्यात येतील.दररोज ५० लाभार्थीची तपासणी समुदाय आरोग्य अधिकारी पार पाडतील.

**ब)** एनसीडी अंतर्गत तपासणी झालेल्या ३० वर्षावरील नागरिकांना National Digital Health Identification नंबर देण्यात येईल.

**क)** ENT सेवांतर्गत बहिरेपणा व कानांचे आजारांची तपासणी करण्यात येईल. बहिरेपणा ही एक मोठी समस्या असून निवडलेल्या गावातील नागरिकांच्या कानांच्या तपासणीसाठी बाहयसंपर्क शिबीरे आयोजित करण्यात येतील. या शिबीराव्दारे कानांचे आजार व बहिरेपणाग्रस्त व्यक्तीस शोधण्यास मदत होईल. तसेच त्यांच्यावर उपचार करण्यात येईल, किंवा त्या रुग्णांना जिल्हा रुग्णालयात पुढील औषधोपचार व

तपासणीसाठी पाठविण्यात येईल. शालेय शिक्षकांच्या मदतीने शाळेत शालेय मुलांचे कानांचे आजारासाठी शिबीरे घेण्यात येतील.

**ड)** गावामधील लोकांचे तंबाखू सेवना बाबत दुष्परिणामांची माहिती देण्यात येऊन तंबाखू मुक्तिसाठी समुपदेशन करण्यात येईल.

**८) दिव्यांगत्व तपासणी, मूल्यमापन व प्रमाणपत्र वितरण -**

दिव्यांग व्यक्तींचे जीवनमान उंचावण्यासाठी त्यांना सन्मानाने वेगवेगळ्या संधी उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण आणी संपूर्ण सहभाग कायदा संमत केला आहे. त्या अंतर्गत गावामध्ये आरोग्य सेवकां मार्फत अपंग व्यक्ती शोधल्या जातील व त्यांना जिल्हा रुग्णालयातून तात्काळ अपंगत्व प्रमाणपत्र देण्याची व्यवस्था करण्यात येईल.

**९) राष्ट्रीय क्षयरोग दुरीकरण कार्यक्रम**

जगातील राष्ट्रांपैकी भारत देशमधील व भारतातील राज्यांपैकी महाराष्ट्र राज्यातील क्षय रुग्णांचे प्रमाण चिंताजनक असून जागतिक आरोग्य संघटनेच्या व Central TB Division च्या मार्गदर्शक सूचने नुसार राष्ट्रीय क्षयरोग दुरीकरण कार्यक्रम राज्यात राबविण्यात येतो. या कार्यक्रमातंर्गत निदान झालेल्या क्षयरुग्णांना त्यांच्या वजनानुसार उत्तम दर्जाचे क्षयविरोधी औषधी (Fix Dose Combination मध्ये) उपचार पुर्ण होई पर्यंत अखंडित पुरविण्यात येतात, क्षयरोग पथकामधील वैदयकिय अधिका-यांच्या मार्फत क्षयरुग्णांचे उपचार पुर्ण होण्याकरिता सतत त्यांची देखरेख व पर्यवेक्षण करण्यात येते, कार्यक्रमांतर्गत निदान झालेल्या औषधविरोधी क्षयरुग्णांना मार्गदर्शक सुचनांनुसार क्षयविरोधी औषधांचे उपचार सुरु करण्यात येतात. निवडलेल्या गावामध्ये संशयित क्षयरोग रुग्ण शोध मोहीम घेऊन क्षयरुग्ण आढळल्यास त्वरित नोंदणी करून उपचार सुरू करण्यात येतील व उपचार अर्धवट सोडलेल्या रुग्णांना समुपदेशन करून पुन्हा उपचाराखाली आणण्यात येईल.

**१०) राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रम-**

राष्ट्रीय कुष्ठरोग निर्मुलन कार्यक्रमातंर्गत आरोग्य कर्मचारी संशयित कुष्ठरुग्ण शोधून प्राथमिक आरोग्य केंद्राच्या वैद्यकिय अधिकाऱ्यांकडे निदान निश्चिती करीता पाठवितात. वैद्यकिय अधिकाऱ्यांनी निदान निश्चिती ७ दिवसांच्या आत करणे अपेक्षित आहे.तसेच नविन कुष्ठरुणांना अप्रत्यक्ष सर्वेक्षणाद्वारे वैद्यकिय अधिकारी बाहयरुग्ण तपासणीमध्ये शोधतात. स्वेच्छा तपासणीसाठी संशयित कुष्ठरुग्ण स्वतःहून लवकरात लवकर पुढे यावेत म्हणून माहिती आरोग्य शिक्षण व संवाद व प्रसिद्धी कार्यक्रम क्षेत्रिय स्तरावर राबविला जातो.कुष्ठरोगाचे निदान निश्चिती झाल्यावर कुष्ठरुग्णांना त्वरीत बहुविध औषधोपचाराखाली

रोगप्रकारानुसार आणले जाते. निवडलेल्या गावामध्ये कुष्ठ रुग्ण शोध मोहीम घेण्यात येईल व रोग निश्चिती झाल्यानंतर रूग्णाला उपचार सुरू करण्यात येतील.

**११) Hematology कार्यक्रम**

या कार्यक्रमांतर्गत थॅलेसीमिया,सिकलसेल अथवा हिमोफीलिया या आजारांवर उपचार देण्यात येतात.

अ) **सिकलसेल-** सिकलसेल आजार नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सिकलसेल आजाराबाबत माहिती देणे, मोफत सोल्युबिलीटी चाचणी,मोफत समुपदेशन, इलेक्ट्रोफोरेसीस केंद्रावर मोफत इलेक्ट्रोफोरेसीस चाचणी, सिकलसेल रुग्ण (सफरर) व्यक्तींसाठी नियमित आरोग्य तपासणी, सिकलसेल रुग्ण (सफरर) व्यक्तींना गरजेनुसार फॉलीक ॲसीडच्या गोळया, ॲन्टीबायोटीक्स (प्रतिजैविके), तसेच वेदनानाशक (पेनकिलर्स) औषधांचा पुरवठा, आवश्यकतेनुसार रक्त चाचण्यांची सुविधा,रक्तपेढी उपलब्ध असलेल्या संस्थेत सिकलसेकल रुग्णांना (सफरर) रक्तसंक्रमण सुविधा,एच.पी.एल.सी. चाचणी केंद्रामध्ये मोफत एच.पी.एल.सी. चाचणी सोय, तज्ञ डॉक्टरांच्या सल्ल्यासाठी टेलिमेडीसीन सुविधा या सेवा देण्यात येतात.

ब) **हिमोफिलीयाः**-हिमोफिलीया हा अनुवंशिक रक्तदोषामुळे होणारा आजार आहे. स्त्रिया या हिमोफिलीया आजाराच्या वाहक असतात व पुरुषांना या आजाराची लक्षणे दिसुन येतात. यामध्ये जखम झाल्यास, दात काढणे, फ्रक्चर होणे, इ. मुळे रक्त थांबणे बंद होत नाही. सर्वसाधारण व्यक्तीत जखमेतील रक्त काही मिनिटाने गोठते व शरीरातील रक्त शरीराबाहेर जाऊ दिले जात नाही. मात्र हिमोफिलीया रुग्णांमध्ये रक्त सतत वाहत रहाते. हिमोफिलीया आजाराच्या रुग्णांमध्ये स्नायु, सांध्यांमध्ये तसेच मेंदुतरक्तस्त्राव केव्हाही होतो. त्यामुळे त्या रुग्णास त्वरित फॅक्टरचे इंजेक्शन देणे गरजेचे असते. सांध्यामध्ये रक्तस्त्राव होत असल्याने सांधे सुजणे, दुखणे व पर्यायाने अपंगत्व येते. फॅक्टर VIII व IX चे इंजेक्शन घेणा-या काही रुग्णांमध्ये Antibody तयार झाल्याने त्यांना फॅक्टर VIII व IX चे इंजेक्शन गुणकारी होत नसल्याने त्यांनाफॅक्टर VII व FEIBA चे इंजेक्शन देण्यात येते.

क) **थॅलेसीमिया:-** हा रक्ताचा एक गंभीर आजार असून याची सुरवात बालपणी होते. रुग्णांच्या रक्तामध्ये हिमाग्लोबिन चे प्रमाण पुरेसे तयार होत नाही. याची प्रमुख लक्षणे म्हणजे फिकटपणा, अशक्तपणा, चीडखोरपणा, ताप, आहार समस्या, अतिसार ही आहेत. थॅलेसेमिया वाहकाचे स्क्रिनिंग आयुष्यात फक्त एकदाच करावयाचे असते, कोणत्याही वयात करता येते पण विवाह करण्यापुर्वी तपासणी करणे हितावह असते. थॅलेसेमिया रुग्णांसाठी समूपदेशनः-रुग्णांना विवाह पुर्व समूपदेशन करण्यात येते. निवडलेल्या

गावामध्ये थॅलेसीमिया,सिकलसेल अथवा हिमोफीलिया यांचे रुग्ण असल्यास त्यांचा शोध घेऊन उपचार सुरू करण्यात येतील.थॅलेसीमिया रुग्णांना मोफत रक्त पुरवठा करणेच्या दृष्टीने ओळखपत्र दिले जाईल. सिकलसेल नियंत्रण कार्यक्रमांतर्गत रुग्णांचे समुपदेशन,उपचार व त्यांना कार्ड वाटप केले जाईल. हिमोफीलिया रुग्णांना मोफत संदर्भ सेवा देण्यात येईल. थॅलेसेमिया, हिमोफिलीया व सिकलसेल आजाराचा महात्मा फुले जीवन दायी आरोग्य योजने अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

**१२) जलजन्य रोगनियंत्रण कार्यक्रम-**

गावामध्ये जलजन्य आजारावर आळा घालण्यासाठी पाणी गुणवत्ता नियमितपणे तपासली जाईल.कीटकजन्य आजारांचे नियंत्रण करण्यासाठी नियमित कीटकनाशकांची फवारणी केली जाईल व हवेतून पसरणाऱ्या आजाराचा रुग्ण आढळल्यास त्वरीत जिल्हा व राज्य स्तरावरून मार्गदर्शन घेवून साथ आटोक्यात ठेण्यात येईल.

**१३) कोविड लसीकरण-**

कोरोंना विषाणू आजाराच्या प्रतिबंध व नियंत्रणासाठी केंद्रशासनाच्या मदतीने राज्यात सर्व उपाययोजना राबविल्या जात आहेत. यामध्ये प्रयोगशाळा निदान व्यवस्था, आवश्यक साधनसामुग्री, उपचार, संस्थात्मक Quarantine सुविधा उपलब्ध आहेत. गावामधील सर्व नागरीकांचे कोविड-१९ चे लसीकरण पूर्ण करण्यात येईल. उपरोक्त सेवांबरोबरच आरोग्य विभागामार्फत देण्यात येणा-या इतर आरोग्य सेवा नेहमी प्रमाणेच संस्थांकडून देण्यात येतील.

**१४) आरोग्य कर्मचा-यांच्या आरोग्य तपासण्या-**

जनतेला प्रभावी पणे आरोग्य सेवा पुरविण्यासाठी आरोग्य सेवा पुरविणारे सर्व आरोग्य कर्मचारी व अधिकारी यांचे आरोग्य उत्तम असणे आवश्यक असल्याने निवड केलेल्या सर्व आरोग्य संस्थामधील आरोग्य कर्मचाऱ्यांची सर्वसाधारण आरोग्य तपासणी करण्यात येईल व आवश्यक असल्यास विशेषज्ञ सल्ला देण्यात येईल. आवश्यक त्या तपासण्या विभागातील आरोग्य संस्थामध्ये मोफत देण्यात येतील.

**१५) आदर्श आरोग्य गाव मोहिमेची प्रसिद्धी-**

स्वातंत्र्याचा अमृतमहोत्सव अंतर्गत राज्यात राबविण्यात येणाऱ्या विविध उपक्रम/ कार्यक्रमा बाबत जनजागृती, प्रचार-प्रसिध्दी करण्यासाठी माहीती, शिक्षण व संवाद (IEC) च्या विविध उपक्रमाचा जसे Mass मिडीया, Outdoor मिडीया, Social मिडीया, Group मिडीया, आंतरव्यक्ती संवाद (IPC), पारंपारीक मिडीया इ. उपक्रमांचा यथोचित वापर करण्यात येईल. स्वातंत्र्याचा अमृतमहोत्सव उपक्रमांना यथोचित

प्रसिद्धी देणाऱ्या पत्रकार/वार्ताहर यांना सन्मानित करण्यात येईल. स्वातंत्र्याचा अमृतमहोत्सव अंतर्गत राज्यात राबविण्यात येणाऱ्या सर्व उपक्रमांचे दस्ताऐवजीकरण (Documentation) करण्यात येईल. सदर सर्व उपक्रमांचे मुल्यमापन करण्यात येऊन उत्कृष्ट् कार्य करणाऱ्या संस्था यांना गौरवण्यात येईल.

**१६) आदर्श आरोग्य गाव मूल्यमापन**

सदर सेवांचे मूल्यमापन सोबत जोडलेल्या प्रपत्रातील निर्देशकानुसार करण्यात येईल.माहे डिसेंबर २०२१ पासून चे अपेक्षित लाभार्थी व माहे जुलै २०२२ अखेरीस साध्य कार्यपूर्तीवरून उत्कृष्ठ आरोग्य गावे निवडण्यात येतील. प्रत्येक निर्देशकासाठी ४ गुण असून १००% साध्य पूर्ण केल्यास ४ गुण,९०% ते ९९% साठी ३ गुण ,८०% ते ८९ % साठी २ गुण व ७०% ते ७९% साध्य पूर्ण केल्यास १ गुण व ७०% पेक्षा कमी साध्य पूर्ण केल्यास शून्य गुण देण्यात येतील.

**१७)** स्वातत्र्याचा अमृत महोत्सव-अंतर्गत आदर्श आरोग्य गाव संकल्पना प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्यस्तरीय नोडल ऑफीसर म्हणून सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई (तांत्रिक) यांना नियुक्त करण्यात येत असून त्यांनी सदर उपक्रमांच्या अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापनासाठी राज्यस्तरीय कक्ष स्थापन करावा. कार्यक्रम स्तरावर संबंधित आरोग्य कार्यक्रम प्रमुख यांची नियूक्ती करण्यात आली असून त्यांनी सदर उपक्रमांच्या अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापनासाठी कार्यक्रमस्तरीय कक्ष स्थापन करावा. विभागस्तरीय नोडल ऑफीसर, म्हणून उपसंचालक आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व) यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यानी सदर उपक्रमांच्या अमलबजावणी संनियंत्रण व मूल्यमापनासाठी परिमंडळस्तरीय कक्ष स्थापन करावा. जिल्हास्तरीय नोडल ऑफीसर म्हणून -जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद॰ याची नियुक्ती करण्यात आली असून त्यानी सदर उपक्रमांच्या अंमलबजावणी संनियंत्रण व मूल्यमापनासाठी जिल्हास्तरीय कक्ष स्थापन करावा.जिल्हा शल्य चिकित्सक यांनी जिल्हा स्तरावर सदर कार्यक्रम राबविण्यासाठी रुग्णालया संबधित असलेली कार्यवाही जसे की, संदर्भित करण्यात आलेल्या रूग्णांच्या तपासण्या, शस्त्रक्रिया, आवश्यक ती प्रमाणपत्रे देणे याबाबत कार्यवाही करावी.

**१८)** तसेच तालुकास्तरीय नोडल अधिकारी म्हणून तालुका आरोग्य अधिकारी (सर्व) यांची नियुक्ती करण्यात येत आहे. त्यांनी सदर उपक्रमांच्या अमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापनासाठी तालुकास्तरीय कक्ष स्थापन करावा त्यांनी सर्व वैद्यकीय अधीक्षक,रुग्णालये व वैद्यकीय अधिकारी प्राथमिक आरोग्य केंद्रे यांचे मार्फत समन्वयने आदर्श आरोग्य गाव संकल्पना राबवावी.

**१९)** सर्व नोडल अधिकारी यांनी केंद्र तसेच राज्य शासनाकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या सूचनांनूसार उपक्रम प्रभावीपणे राबवण्याबाबत राज्य, जिल्हा व तालूका स्तरावरुन आवश्यक ती कार्यवाही करावी. जिल्हास्तर नोडल ऑफीसर, तालुकाकास्तर नोडल ऑफीसर यांनी **राज्यस्तरीय** नोडल ऑफीसर

यांच्या संपर्कात राहून सदरील उपक्रम यशस्वी करुन व उपक्रमाचा आढावा घेऊन त्याचा अहवाल राज्यस्तरीय नोडल ऑफीसर यांचेमार्फत शासनास सादर करावा. आदर्श गाव मोहिमे अंतर्गत मूल्यांकनासाठी आवश्यक माहिती सोबत जोडलेल्या प्रपत्र "ब" मध्ये सादर करावी.

२०) यासाठी होणारा खर्च सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदितून भागवावा. सदर कार्यक्रमासाठी अतिरीक्त तरतुद उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

२१) आपत्कालीन व्यवस्थापन, मदत व पुर्नवसन या विभागाचे "कोवीड-१९" च्या व्यवस्थनेबाबत "राष्ट्रीय मार्गदर्शक सूचना" या मथळयाखाली नमूद सर्व सूचना तसेच या विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

२२) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasthra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा सांकेतांक २०२१११२२१७३६३४५७१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुंसार व नावाने,

(डॉ. प्रदीप व्यास)
अपर मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खासगी सचिव
३. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव,
४. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव व प्रधान सचिव
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा / विधान परिषद यांचे खाजगी सचिव
७. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खासगी सचिव
८. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खासगी सचिव
९. सर्व मंत्री / राज्यमत्री यांचे खासगी सचिव

१०.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
११.आयुक्त (आरोग्य सेवा) अभियान व संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१२.आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
१३.संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई / पुणे
१४.प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस नियंत्रक, मुंबई
१५.मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा फुले जन आरोग्य योजना, वरळी, मुंबई
१६.सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.निवडनस्ती (समन्वय २)

प्रपत्र अ

## आदर्श आरोग्य गाव योजनेसाठी जिल्हानिहाय गावांची संख्या

| Sr No. | district | Estimated Rural population २०२१ | Villages to be covered |
|---|---|---|---|
| १ | Thane | १६८२३२१ | १२५ |
| २ | Palghar | १२००९९१ | ८९ |
| ३ | Raigad | १६५१७२९ | १२२ |
| ४ | Nashik | ३९८०५३३ | २९४ |
| ५ | Dhule | १६९९१०० | १२६ |
| ६ | Nandurbar | १६४१५९८ | १२२ |
| ७ | Jalgaon | ३१४०३५७ | २३३ |
| ८ | A'nagar | ४०३६०५० | २९९ |
| ९ | Pune | ४३६४४०० | ३२३ |
| १० | Solapur | ३२१९५८० | २३८ |
| ११ | Satara | २४५७२६८ | १८२ |
| १२ | Kolhapur | २८२१०८२ | २०९ |
| १३ | Sangli | २२५६९५७ | १६७ |
| १४ | Sindhudurg | ६९५७६१ | ५२ |
| १५ | Ratnagiri | ११८८४२४ | ८८ |
| १६ | A,bad | २३५७६८३ | १७५ |
| १७ | Jalna | १८६६४९९ | १३८ |
| १८ | Parbhani | १४९७०७३ | १११ |
| १९ | Hingoli | ११७२५८४ | ८७ |
| २० | Latur | २०७८०६८ | १५४ |
| २१ | Osmanabad | १५०८२३३ | ११२ |
| २२ | Beed | २३७८१७८ | १७६ |
| २३ | Nanded | २७०६७०५ | २०० |
| २४ | Akola | ११९३८९६ | ८८ |

| | | | |
|---|---|---|---|
| २५ | Washim | ११३३०७३ | ८४ |
| २६ | Amravati | १९९९४२४ | १४८ |
| २७ | Yavatmal | २३५७२२५ | १७५ |
| २८ | Buldhana | २३२७४२८ | १७२ |
| २९ | Nagpur | १४९६७६४ | १११ |
| ३० | Wardha | ८३७६७१ | ६२ |
| ३१ | Bhandara | ९६९८४० | ७२ |
| ३२ | Gondia | ११३७२८४ | ८४ |
| ३३ | Chandrapur | १४४३४२० | १०७ |
| ३४ | Gadchiroli | १००६३६० | ७५ |
| | **Rural Total** | **६७५०३५५९** | ५००० |

प्रपत्र ब

## आरोग्यासाठी आदर्श गाव मोहीमे अंतर्गत मूल्यांकनासाठी निर्देशक

| अ क्र | निर्देशक | अपेक्षित | साध्य | % |
|---|---|---|---|---|
| १ | आयोजित करण्यात आलेल्या wellness session ची संख्या (दर आठवड्याला किमान एक या नुसार) | | | |
| २ | प्रसूतिपूर्व ४ तपासण्या करण्यात आलेल्या मातांची संख्या | | | |
| ३ | एकूण किशोरवयीन मुलांपैकी आर के एस के योजने अंतर्गत तपासणी केलेल्या किशोरवयीन मुलांची संख्या | | | |
| ४ | एकूण बालकापैकी आर बी एस के अंतर्गत तपासणी केलेल्या बालकांची संख्या | | | |
| ५ | एकूण गर्भवती मातांपैकी९ ग्रॅम पेक्षा कमी हिमोग्लोबिन आढळलेल्या गर्भवती मातांची संख्या | | | |
| ६ | संस्थात्मक प्रसुती | | | |
| ७ | जननी सुरक्षा योजने अंतर्गत लाभ दिलेले लाभार्थी | | | |
| ८ | कुटूंब कल्याण शस्त्रक्रीया | | | |
| ९ | एकूण किशोर वयीन मुलापैकी९ ग्रॅम पेक्षा कमी हिमोग्लोबिन आढळलेल्या मुलाची संख्या | | | |
| १० | एकूण बालकापैकी ९ ग्रॅम पेक्षा कमी हिमोग्लोबिन आढळलेल्या बालकांची संख्या | | | |
| ११ | पात्र महिलांपैकी तांबी बसविण्यात आलेल्या महिलांची संख्या | | | |
| १२ | प्रसूती नंतर एका तासाच्या आत स्तनपान सुरू केलेल्या बालकांची संख्या | | | |
| १३ | नवजात बालकांपैकी Hepatitisजन्म डोस देण्यात आलेल्या ची संख्या | | | |
| १४ | ९ते ११ महिन्यातील संपूर्ण लसीकरण झालेल्या बालकांची संख्या | | | |
| १५ | कायाकल्प अंतर्गत संस्था | | | |
| १६ | मोतीबिंदु आढळलेल्या रुग्णांपैकी शस्त्रक्रिया करण्यात आलेल्या रुग्णांची संख्या | | | |
| १७ | Hydrocele रुग्णांपैकी शस्त्रक्रिया करण्यात आलेल्या रुग्णाची संख्या | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १८ | ३० वर्षापेक्षा जास्त वयाच्या नागरिकांचे NCD अंतर्गत Screening ची संख्या | | | |
| १९ | ३० वर्षावरील नागरिकांपैकी National Digital Health Identification नंबर देण्यात आलेल्या नागरिकांची संख्या | | | |
| २० | NCD अंतर्गत Screening मध्ये उच्च रक्त दाब निदान झालेल्या रुग्णांपैकी उपचार सुरू करण्यात आलेल्या रुग्णांची संख्या | | | |
| २१ | NCD अंतर्गत Screening मध्ये मधुमेह निदान झालेल्या रुग्णांपैकी उपचार सुरू करण्यात आलेल्या रुग्णांची संख्या | | | |
| २२ | NCD अंतर्गत Screening मध्ये कर्करोगाबाबत शक्यता आढळललेल्यापैकी रोग निदांनासाठी सदर्भित करण्यात आलेल्या रुग्णांची संख्या | | | |
| २३ | आढळलेल्या अपंग व्यक्तींपैकी अपंगत्व प्रमाणपत्र देण्यात आलेल्या व्यक्तींची संख्या | | | |
| २४ | तंबाखू मुक्तिबाबत जनजागृती साठी आयोजित केलेल्या सत्रांची संख्या (दर आठवड्याला किमान एक या नुसार) | | | |
| २५ | कुष्ठरोग निदान झालेल्या रुग्णांपैकी उपचार सुरू करण्यात आलेल्या रुग्णाचे ची संख्या | | | |
| २६ | क्षयरोग निदान झालेल्या रुग्णांपैकी उपचार सुरु करण्यात आलेल्या रुग्णाची संख्या | | | |
| २७ | थलेसेमिया सिकलसेल अथवा हिमोफोलिया निदान झालेले रुग्णपैकी व उपचार सुरू करण्यात आलेल्या रुग्णाची संख्या | | | |
| २८ | आरोग्य संस्था मधील अधिकारी कर्मचारी यांचे सर्वसाधारण आरोग्य तपासणी केल्याची संख्या | | | |